**मृद व जलसंधारण विभागाकडे विकल्प दिलेल्या श्री.सुरेश देवसिंग जाधव, शाखा अभियंता यांच्या समावेशनाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आस्थाप-२०२१/प्र.क्र.१७२ (भाग-१)/जल-२**

हुतात्मा राजगुरु चौक,मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: २४ जून, २०२४

**वाचा :-** १) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्रमांक : आस्थाप २०१६/प्र.क्र.८८ (भाग-९)/जल-२, दि.३१/५/२०१७

२) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन प्रसिद्धीपत्रक क्रमांक : आस्थाप २०१६ /प्र.क्र.८८ (भाग-९)/जल-२, दि.३१/५/२०१७

३) मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई खंडपीठ, नागपूर यांचे मूळ अर्ज क्र.१५४/ २०२१ मधील दि.१७/०८/२०२२ रोजीचे आदेश.

४) आयुक्त, मृद व जलसंधारण, छत्रपती संभाजीनगर यांचे पत्र क्र.जा.क्र.आमृवजसंऔ/प्रलि-२/न्या.प्र./२०२३/३२९ सह, दि.०१/०३/२०२३

**प्रस्तावना :-**

मृद व जलसंधारण या प्रशासकीय विभागाची निर्मिती उपरोक्त संदर्भ क्र.१ वरील शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. मृद व जलसंधारण या नवीन प्रशासकीय विभागाचा आकृतिबंध निश्चित करण्यात येऊन, या नवीन प्रशासकीय विभागाकडे कायमस्वरूपी वर्ग होऊ इच्छिणाऱ्या जलसंपदा विभाग व कृषी विभागातील अधिकारी/कर्मचारी यांच्याकडून दि.१५/०७/२०१७ या दिनांकापूर्वी विकल्प मागविण्यात आले होते. त्यास अनुसरून जलसंपदा विभागाकडील गट- “अ”, “ब”, “क” व “ड” या संवर्गातील प्राप्त झालेले सर्व विकल्प व आक्षेप विचारात घेऊन या विभागामार्फत याबाबतची यादी प्रसिद्ध करण्यात आली आहे.

श्री.सुरेश देवसिंग जाधव, शाखा अभियंता, जलसंपदा विभाग यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई खंडपीठ, नागपूर येथे मूळ अर्ज क्र.१५४/२०२१ दाखल केला होता. सदर मूळ अर्जाद्वारे श्री.जाधव यांनी मृद व जलसंधारण विभागाकडे सेवा समावेशनासाठी सादर केलेला दि.०२/११/२०१७ रोजीचा विकल्प मंजूर करून त्यांच्या नावाचा मृद व जलसंधारण विभागाच्या जलसंधारण अधिकारी (स्थापत्य), गट-ब (राजपत्रित) संवर्गाच्या ज्येष्ठता यादीत समावेश करण्याची मागणी केली होती.

मूळ अर्ज क्र.१५४/२०२१ प्रकरणी मा.न्यायाधिकरणाने दि.१७/०८/२०२२ रोजी पारित केलेल्या आदेशाच्या अनुषंगाने, श्री. जाधव, शाखा अभियंता यांचे मृद व जलसंधारण विभागाकडे सेवा समावेशन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

श्री.सुरेश देवसिंग जाधव, शाखा अभियंता यांनी या विभागाकडे कायमस्वरूपी सेवा समावेशनासाठी दि.०२/११/२०१७ रोजी विकल्प सादर केला आहे. सबब उक्त संदर्भ क्र.१ मध्ये नमूद

शासन निर्णय दि.३१/०५/२०१७ मधील परिच्छेद ८ (VI) मधील तरतुदीनूसार, तसेच उक्त संदर्भ क्र.३ मधील मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई खंडपीठ, नागपूर यांचे आदेश पाहता, सक्षम प्राधिकारी यांचे मान्यतेने, श्री.सुरेश देवसिंग जाधव, शाखा अभियंता, जलसंपदा विभाग यांचे दि.०२/११/२०१७ या विकल्प दिलेल्या दिनांकापासून, मृद व जलसंधारण विभागाच्या "जलसंधारण अधिकारी (स्थापत्य), गट-ब (राजपत्रित)" या संवर्गात सेवा समावेशन करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक २०२४०६२४१६५९२४२०२६ असा आहे. सदर शासन निर्णय डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHARAD HARIBHAU KHARODE

Digitally signed by SHARAD HARIBHAU KHARODE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=105495a2f65de66c63cfc6bedf0908609cdfef1f5c2d9f0dda9eaa0a7a2eb2b2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=98323DC4023E9DA24F8749363CEF984072C9433AE29F383A8BC8CCBADBFBAA31, cn=SHARAD HARIBHAU KHARODE
Date: 2024.06.24 17:16:27 +05'30'

**( श. ह. खारोडे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, मृद व जलसंधारण महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. महालेखापाल ½ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
३. महालेखापाल ½ (लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
४. अपर मुख्य सचिव (जलसंपदा) मंत्रालय मुंबई
५. सचिव, (मृद व जलसंधारण) यांचे स्वीय सहायक.
६. सचिव (लाक्षेवि) जलसंपदा, मंत्रालय मुंबई
७. आयुक्त, मृद व जलसंधारण, छत्रपती संभाजीनगर
८. अपर आयुक्त जलसंधारण, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, नागपूर
९. प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, अमरावती/ नागपूर.
१०.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ
११.जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, यवतमाळ
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ
१३. सर्व सह सहसचिव/उप सचिव/अवर सचिव/मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय मुंबई.
१४.श्री. सुरेश देवसिंग जाधव, शाखा अभियंता, उपविभागीय जलसंधारण अधिकारी कार्यालय मृद व जलसंधारण उपविभाग, दिग्रस जि. यवतमाळ (ई-मेल द्वारे)
१५.निवड नस्ती (जल-२)